**राज्यातील विकास योजनांचे / कार्यक्रमांचे मूल्यमापन अभ्यास पाहणी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : मुमाअ-१०१७/५७९/प्र.क्र. ७५/का-१४१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ६ जुलै, २०१७

**वाचा :** १) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक वियोमू-११९८/प्र.क्र. ६/का-१४१३ दिनांक ३० सप्टेंबर, १९९८

२) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक मुमाअ-१०१६/प्र.क्र.७८/का-१४१७ दिनांक २२ जुलै, २०१६

**परिपत्रक -**

शासनामार्फत विविध विकास योजना / विकास कार्यक्रम राबवून राज्याचा विकास करण्याचा प्रयत्न करण्यात येत असतो. या योजना / कार्यक्रमांच्या अंमलबजावणीची मूल्यमापन करणे हा नियोजन प्रक्रियेतील महत्वाचा भाग आहे. मूल्यमापन अभ्यासाद्वारे योजनांचे यशापयश व अंमलबजावणीतील त्रुटी निदर्शनास येतात. या त्रुटी दूर करून योजनेत सुधारणा करण्याची व कार्यक्रम अधिक चांगल्या प्रकारे व परिणामकरकपणे राबविण्याची संधी संबंधित प्रशासकीय विभागांना / अंमलबजावणी यंत्रणेला प्राप्त होत असल्याने नियोजनात मूल्यमापन कामाला अनन्यसाधारण महत्व आहे.

२. शासन निर्णय, दिनांक ३० सप्टेंबर, १९९८ मधील परिच्छेद ८ अन्वये शासनामार्फत राबविण्यात येत असलेल्या योजना किंवा योजनेअंतर्गत कार्यक्रमाचे मूल्यमापन करण्याची जबाबदारी (१) अर्थ व सांख्यिकी संचालनालय (२) विहित निकष पूर्ण करणा-या अशासकीय संस्था (३) विभागीय आयुक्त कार्यालयातील विशेष कार्य अधिकारी (उपआयुक्त-नियोजन) व जिल्हाधिकारी कार्यालयातील जिल्हा नियोजन अधिकारी यांची असल्याचे निर्देशित करण्यात आलेले आहे.

३. दिनांक ३० सप्टेंबर, १९९८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ८.३ नुसार विशेष कार्य अधिकारी (उपआयुक्त-नियोजन) व जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय यांनी त्यांच्या स्तरावरून वर्षातून किमान दोन कार्यक्रमांचे मूल्यमापन करणे आवश्यक आहे. जिल्हा पातळीवर ज्या कार्यक्रमांचे मूल्यमापन जिल्हा नियोजन कार्यालयामार्फत होईल त्या मूल्यमापन अहवालावर चर्चा संबंधित जिल्हाधिकारी यांच्या सहमतीने ठेवणेबाबत तर विभागस्तरावरील विशेष कार्य अधिकारी यांनी केलेल्या मूल्यमापन अभ्यास अहवालावर विभागीय आयुक्तांच्या सहमतीने संबंधित जिल्हाधिकारी व संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे समन्वय सभेत चर्चिले जावेत असे निर्देशित करण्यात आलेले आहे.

४. शासन निर्णयामध्ये दिलेल्या निर्देशानुसार जिल्हा नियोजन अधिका-यांनी करावयाचे मूल्यमापन हे त्या विशिष्ट कार्यक्रमाची अंमलबजावणी ज्या संबंधित जिल्ह्यात झालेली असेल तेवढ्यापुरतीच मर्यादित राहील. विशेष कार्य अधिका-यांनी केलेल्या मूल्यमापनाची कार्यकक्षा ही त्यांच्या महसूली विभागात राबविल्या गेलेल्या योजनांपुरती मर्यादित असेल.

५. योजनांच्या मूल्यमापनासाठी शासन निर्णय दिनांक २२ जुलै, २०१६ नुसार नामांकित बाह्यस्थ संस्थांची नामिका सूची (Empanelment) तयार करण्यात आलेले आहे. शासन निर्णयामध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार मर्यादित स्वरूपाच्या निविदाद्वारे बाह्यस्थ संस्थाकडून कामे निश्चित करण्याची मुभा शासकीय कार्यालयांना आहेत. याबाबत काही अडचणी असल्यास संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय यांच्या कार्यालयाशी संपर्क साधावा.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७०६१५४७४९०३१६ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2017.07.06 15:47:53 +05'30'

**(प्रियांका रं. छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, मुंबई

२) सर्व विभागीय आयुक्त,

३) सर्व जिल्हाधिकारी,

४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई

५) उपआयुक्त (नियोजन), सर्व विभागीय आयुक्त कार्यालय,

६) जिल्हा नियोजन अधिकारी, सर्व जिल्हा नियोजन समिती,

७) नियोजन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई-३२

८) निवड नस्ती, का-१४१७, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२